श्री.लिलाधर माणिकराव दुफारे उप आयुक्त (पुरवठा) यांचा दिनांक ०१/०६/२०१० ते दिनांक १९/१२/२०१० आणि दिनांक २२.०२.२०१४ ते दिनांक ०१.०३.२०१४ हा सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी कर्तव्य कालावधी म्हणून ग्राहय धरण्याबाबत.



**महाराष्ट्र शासन**
**अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**ज्ञापन क्र. आस्थाप्र-६८२३/प्र.क्र.१७३/ना.पु.१५**
मंत्रालय, विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- ३० जून, २०२३.

**संदर्भ :-** १. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.सेनिवे-२००१/१३०/सेवा-४, दिनांक २ जून, २००३
२. वित्त विभाग अधिसूचना क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२७/सेवा-६, दि.३/३/२०१६.
३. शासन आदेश क्र. आस्थाप्र-११०९/५२३/प्र.क्र.१११/ना.पु.१५, दि.२८/०५/२०१०.
४.शासन आदेश क्र.पदोन्न-२०२१/प्र.क्र.१३०/ना.पु.१५, दि.१०/०१/२०२३.
५. उप आयुक्त (पुरवठा) कोकण विभाग, कोकण यांचे पत्र क्र.पुरवठा/कार्या-२अ/आस्था/प्रति.का./कावि११४९२/२०२३, दिनांक १७/१/२०२३.
६. उप आयुक्त (पुरवठा) कोकण विभाग, कोकण यांचे पत्र क्र.पुरवठा/कार्या२अ/आस्था/प्रति.का./दुफारे/२०२३, दिनांक १७/०४/२०२३.

**प्रस्तावना :-**

शासनाच्या संदर्भाधीन दिनांक २८/०५/२०१० च्या आदेशान्वये श्री. लिलाधर माणिकराव दुफारे यांची जिल्हा पुरवठा अधिकारी, ठाणे या पदावर तात्पुरती पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली. त्यानुसार अपर जिल्हाधिकारी, गडचिरोली यांच्या दि.३१/०५/२०१० च्या आदेशान्वये पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्याकरीता श्री. दुफारे यांना ३१/०५/२०१० रोजी (मध्यान्होत्तर) कार्यमुक्त करण्यात आले.

२. श्री. लिलाधर माणिकराव दुफारे, सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी, गडचिरोली यांचे तात्पुरती पदोन्नतीचे आदेश हे दिनांक २८/०५/२०१० रोजी निर्गमित करण्यात आलेले आहेत. त्यानुसार श्री. दुफारे, तत्का. जिल्हा पुरवठा अधिकारी हे हजर होणेकामी दिनांक ०४/०६/२०१०

रोजी अप्पर जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, ठाणे येथे उपस्थित होते. मात्र जिल्हा पुरवठा अधिकारी, ठाणे हे पद १३२, नालासोपारा विधानसभा मतदारसंघ मतदार नोंदणी अधिकारी म्हणून भारत निवडणूक आयोगाने अधिसूचित केले असल्याने व सदरचे पदी उपजिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्याची नियुक्ती करावी असे निवडणूक आयोगाचे आदेश असल्याकारणाने श्री. दुफारे, यांना सदरहू पदावर हजर करुन घेण्यात आले नाही. श्री. लिलाधर माणिकराव दुफारे हे दिनांक ०१/०६/२०१० ते दिनांक १९/१२/२०१० या कालावधीत कोणत्याही आस्थापनेवर कार्यरत नसल्याने सदर कालावधीचे वेतन व भत्ते त्यांना अद्यापपर्यंत देण्यात आलेले नाहीत.

३. तसेच विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांचे आदेश क्र. मशा/कार्या १/आस्था २/उपजि/सिआर/३४११, दि.१८.०२.२०१४ अन्वये श्रीमती अंजली भोसले यांना जिल्हा पुरवठा अधिकारी, ठाणे या पदावर बदलीने पदस्थापना देण्यात आल्याने जिल्हाधिकारी, ठाणे यांच्या दिनांक २१/०२/२०१४ च्या आदेशान्वये श्री. लिलाधर माणिकराव दुफारे यांना जिल्हा पुरवठा अधिकारी, ठाणे या पदावरुन दिनांक २१/०२/२०१४ रोजी मध्यान्होत्तर कार्यमुक्त करण्यात आले. तद्नंतर अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या दि. ०१/०३/२०१४ रोजीच्या आदेशान्वये श्री. लिलाधर माणिकराव दुफारे यांना जिल्हा पुरवठा अधिकारी, रायगड या पदावर बदलीने पदस्थापना देण्यात आली. त्यानुषंगाने दिनांक ०२/०३/२०१४ रोजी सार्वजनिक सुट्टी (रविवार) असल्याकारणाने ते दिनांक ०३/०३/२०१४ रोजी (म.नं.) हजर झाले. श्री. लिलाधर माणिकराव दुफारे हे दिनांक २२.०२.२०१४ ते दिनांक ०१.०३.२०१४ या कालावधीत कोणत्याही आस्थापनेवर कार्यरत नसल्याने सदर कालावधीचे वेतन व भत्ते त्यांना अद्यापपर्यंत देण्यात आलेले नाहीत.

**ज्ञापन :-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, श्री. लिलाधर माणिकराव दुफारे, उपायुक्त (पुरवठा) कोकण विभाग (तत्कालीन जिल्हा पुरवठा अधिकारी, ठाणे) यांना दिनांक ०१/०६/२०१० ते दिनांक १९/१२/२०१० या कालावधीत तसेच तत्कालीन जिल्हा पुरवठा अधिकारी, रायगड यांना दिनांक २२.०२.२०१४ ते दिनांक ०१.०३.२०१४ या कालावधीत प्रशासकीय कारणांमुळे पदस्थापने विना रहावे लागले आहे. या विलंबास श्री. दुफारे हे जबाबदार नसल्याने, त्यांचा दिनांक ०१/०६/२०१० ते दिनांक १९/१२/२०१० आणि दिनांक २२.०२.२०१४ ते दिनांक ०१.०३.२०१४ हा सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ९ (१४) (एफ) मधील तरतुदीनुसार जिल्हा पुरवठा अधिकारी या पदावर “कर्तव्य कालावधी” म्हणून नियमित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच, सदर कालावधीतील वेतन व भत्ते त्यांना अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर ज्ञापन संदर्भाधीन क्र. १ वरील शासन निर्णय दिनांक २/६/२००३ व संदर्भ क्र.२ वरील शासन अधिसूचनेनुसार प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात सचिव (अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०६३०१६४७००९४०६ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJANAN RAMDAS DESHMUKH

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=09c74e56a555b1257e71176f4c700164528f1b5b3ff73c027668f5ff29c069da, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DEE8A196FB0BB879933A88F87075CC443D363994879D49E0C1BA541465369700, cn=GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2023.06.30 16:47:53 +05'30'

**( गजानन रा.देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.लिलाधर माणिकराव दुफारे, उप आयुक्त (पुरवठा) कोकण विभाग, नवी मुंबई.

**प्रत-**

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
२) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
३) उप आयुक्त (पुरवठा), कोकण विभाग, कोकण.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१ /२, मुंबई/ नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७) जिल्हा पुरवठा अधिकारी, ठाणे.
८) जिल्हा पुरवठा अधिकरी, गडचिरोली.
९) जिल्हा पुरवठा अधिकारी, रायगड.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
११) जिल्हा कोषागार अधिकारी,गडचिरोली.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड.
१३) निवडनस्ती-ना.पु.१५.